अधिव्याख्याता,पॅकेजिंग टेक्नॉलॉजी,शासकीय तंत्रनिकेतन,महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट - अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः ससेनि-३२१४/प्र.क्र.६९/१४/तांशि -७
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २५ जुलै, २०१४

संदर्भ :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१५(२)(७४बी)/१२२४३/सात, दि. २५/०३/२०१४ चे पत्र.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवारांची अधिव्याख्याता, पॅकेजिंग टेक्नॉलॉजी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | गुणवत्ता क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १. | १ | श्री. सय्यद इम्रान अहमद कलिमुल्लाह | अराखीव | अराखीव | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर येथे रिक्त पदावर | -- |
| २. | २ | श्रीमती लक्ष्मी ज्ञानेश्वर सपकाळ | अ.जा. | अराखीव महिला वर्गवारीसाठी राखीव असलेल्या एका पदासाठी | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर येथे रिक्त पदावर | संगणक हाताळणी/ वापराबाबतचे प्रमाणपत्र (MS-CIT)सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून |
| ३. | ३ | श्री. राहूल चंद्रकांत आठवले | अ.जा. | अ.जा. वर्गवारीसाठी राखीव असलेल्या एका पदासाठी | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर येथे रिक्त पदावर | वैद्यकीय प्रमाणपत्राच्या अटीच्या अधीन राहून |

०२. गुणवत्ता क्र. २ व ३ येथील मागासवर्गीय उमेदवारांची जात वैधता पडताळणी झाली असून त्यांचा जाती दावा वैध ठरविण्यात आलेला आहे.

०३. गुणवत्ता क्र. २ येथील उमेदवाराने संगणक हाताळणी/वापराबाबतचे प्रमाणपत्र शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/३/२००३ नुसार आवश्यक असल्याने नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत संगणक हाताळणी/वापराबाबतचे प्रमाणपत्र उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

०४. गुणवत्ता क्र. ३ येथील उमेदवाराने महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ११ (१) अन्वये नियुक्ती होण्यापूर्वी किंवा नियुक्तीच्या तारखेपासून त्यांची सहा महिन्याची सेवा पूर्ण होण्यापूर्वी, यापैकी जे अगोदर घडेल त्याप्रमाणे आरोग्याबद्दलचे वैद्यकीय प्रमाणपत्र दाखल करणे बंधनकारक राहील, या अटीच्या अधीन राहून नियुक्ती देण्यात येत आहे. सदर उमेदवाराने वैद्यकीय प्रमाणपत्र नियुक्तीच्या आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत सादर करावे अन्यथा सहा महिन्याच्या कालावधी नंतर सदर नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०५. उक्त नमूद ०३ उमेदवारांची अधिव्याख्याता, पॅकेजिंग टेक्नॉलॉजी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

१) सदर उमेदवारांची वेतनश्रेणी रु. १५,६००-३९,१००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२ दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांना प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिवीक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.७/८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

६) सदर उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

७) उपरोक्त नमुद परिच्छेद क्र. ४ येथील उमेदवारापैकी, गुणवत्ता क्र. ३ येथील उमेदवाराची वैद्यकीय तपासणी नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत पूर्ण करण्यात यावी अन्यथा सहा महिन्याच्या कालावधी नंतर सदर नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

८) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

९) परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

१०) सदर उमेदवारांना वित्त विभाग शासन निर्णय क्र.अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१/१०/२००५ अन्वये निर्धारित केलेली नवीन परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना (Defined Contribution Pension Scheme) लागू ठरेल.

११) सदर उमेदवारांचे प्रचलित नियमानुसार सेवानिवृत्तीचे वय ६० राहील.

१२) उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१३) सदर उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०६. सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्ती नंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदरांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालकामार्फत शासनास सादर करावा.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२८१५३५१७०६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Panditrao Shastri

Digitally signed by Sudhir Panditrao Shastri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sudhir Panditrao Shastri
Date: 2014.07.28 15:34:36 +05'30'

**सुधीर पं. शास्त्री**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित उमेदवार (नोंदणीकृत डाकेने)(e-mail द्वारे)

**प्रत,**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
५. विभागीय सहसंचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, नागपूर.
६. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर
७. (वरील उमेदवारांना रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या

उमेदवारांची संगणक हाताळणी / वापराबाबतचे प्रमाणपत्र व वैद्यकीय प्रमापणपत्र प्राप्त करुन घेण्याच्या अटीच्या अधिन राहुन केली आहे त्या उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटीची पुर्तता करुन घेवून

८. त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)

९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-२, नागपूर.

१०. जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर.

११. निवड नस्ती (तांशि-७).